**छत्रपती शिवाजी महाराजांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारणेकामी होणारा खर्चास सुधारीत प्रशासकीय व अर्थसंकल्पीय मान्यता प्रदान करण्याबाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्मारक ३११८/प्र.क्र.२५०/२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : १९ डिसेंबर, २०१८

**संदर्भ**

१. शा.नि.क्र. स्मारक ३१९६/११४१/प्रक्र१३९/९६/२९ दि. २२.०१.१९९७

२. शा.नि.क्र. स्मारक २०१३/प्रक्र २७७/२९ दि. ०६.०७.२०१३

३. शा.नि.क्र. स्मारक ३११४/प्रक्र ४०/२९ दिनांक २८.०२.२०१४

४. शा.नि.क्र. स्मारक ३११४/प्रक्र ९४/२९ दिनांक १३.०८.२०१४

५. शा.नि.क्र. स्मारक ३११६/अनौस-२/प्रक्र ३०/२९ दिनांक ०३.०२.२०१६

६. शा.नि.क्र. स्मारक ३११५/प्रक्र ४०३/२९ दिनांक ३०.०३.२०१६

७. शा.नि.क्र. स्मारक ३११६/३४७/प्रक्र १८५/२९ दिनांक ०१.०६.२०१७

**प्रस्तावना-**

छत्रपती शिवाजी महाराज यांच्या भव्य स्मारक उभारणीबाबत दि.१४ जुन, १९९६ पासुन विचाराधीन असलेला प्रस्तावास दिनांक २२ जानेवारी १९९७ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे तत्वत: स्वीकृती मिळाली होती. या नंतरच्या घडामोडीत सदरचे स्मारक गोरेगाव ऐवजी मुंबई लगतच्या अरबी समुद्रात उभारण्याबाबत शासन स्तरावर दिनांक १४ फेब्रुवारी, २००५ रोजी निर्णय घेण्यात आला. त्या प्रमाणे **शासन निर्णय क्र स्मारक ३१०४/प्रक्र ६७/२००४/२९ दिनांक ०४.०७.२००५ अन्वये तांत्रिक व उच्चस्तरीय समितीची स्थापना करण्यात आली.** हया सर्व बाबींची अद्यावत स्थिती दिनांक २५.०८.२००९ च्या मंत्रीमंडळ बैठकीत सादर करण्यात आली होती. त्या मंत्रीमंडळ टिप्पणीत नमुद केल्यानुसार सदरच्या स्मारक योजनेसाठी २००८-०९ च्या वार्षिक योजनेत रु.३.५० कोटी, २००९-१० मध्ये रु.५० कोटी मंजुर करण्यात आले होते. तसेच ११ व्या पंचवार्षिक योजनेमध्ये सदर योजनेकरीता रु ३०० कोटी एवढी रक्कम प्रस्तावित केल्याचा उल्लेख आहे. सुधारीत संकल्पनेनुसार स्मारकाचा आराखडा व अंदाजपत्रक तयार केल्यानंतर सदर स्मारकास प्रशासकीय व अर्थसंकल्पीय

मान्यतेच्या अनुषंगाने मंत्रीमंडळासमोर स्वतंत्रपणे प्रस्ताव सादर करावयाचा होता . **सदर निर्णयाच्या अंमलबजावणी कामी शा.नि.क्र. स्मारक २०१३/प्रक्र २७७/२९ दि. ०६.०७.२०१३ अन्वये अन्वेषण व सर्वेक्षणाच्या कामासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली**.

२. या प्रकल्पाबाबत मंत्रीमंडळासमोर दुसरा प्रस्ताव दिनांक ०४.०२.२०१४ रोजी मांडण्यात आला व मंत्रीमंडळाने दिनांक ०५.०२.२०१४ रोजीच्या बैठकीत काही महत्वाच्या बाबींवर मान्यता प्रदान केली होती. मंत्रीमंडळाच्या मान्यताप्राप्त विषयावर दिनांक २८.०२.२०१४ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. **संदर्भांकीत अनुक्रमांक ४ च्या शासन निर्णयाव्दारे आयआयटी, पवई, मुंबई व प्राचार्य सर जे. जे. कॉलेज ऑफ आर्किटेक्चर यांच्याकडुन करण्यात येणारी कामे व स्टुडिओ उभारण्याकामी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय व आर्थिक मान्यता देण्यात आली.** दि. १९.०१.२०१६ च्या शासन निर्णयाव्दारे त्रिस्तरीय समितीची रचना करण्यात आली **व प्रकल्प अंमलबजावणी, देखरेख व समन्वय समितीसाठी कार्यालय स्थापन करण्याबाबत संदर्भांकीत अनुक्रमांक ५ च्या शासन निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. तसेच प्रकल्प अंमलबजावणी करीता पीएमसी यांच्या नियुक्ती व त्यावरील होणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यासाठी संदर्भांकीत अनुक्रमांक ६ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला**. **संदर्भिय अनुक्रमांक ७ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्प कार्यालयासाठी बृहन्मुंबई महानगर पालिकेकडुन विद्युत व जलवाहिनी जोडणीकरीता होणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली.**

२.१ दि.२.०४.२०१६ रोजी प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार म्हणून मे.इजिस इंडिया यांना नेमण्यात आले. सदरचे सल्लागार यांनी या प्रकल्पासाठी २६९२.५० कोटी रूपयांचे अंदाजपत्रक तयार केले. प्रकल्पाची विशेषता लक्षात घेऊन सदर प्रकल्प डीइपीसी (Designing, Engineering, Procurement and Construction) तत्वावर अंमल करण्याचा निर्णय शासन स्तरावरुन झाल्याने निविदाकारांच्या देकारानुसार प्रकल्पाची किंमत ठरविण्याचा प्रसंग आला व परिणामी मान्य संकल्पचित्राच्या आधारावर निविदाकारांशी वाटाघाटी व इतर प्रक्रिया संपन्न झाल्यावर सार्वजनिक बांधकाम विभागाने दि.३०.०८.२०१८ रोजी पूर्ण प्रकल्पास प्रशासकीय व अर्थसंकल्पीय मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला. प्रस्तावाप्रमाणे सदरच्या संपूर्ण प्रकल्पाची कार्यान्वयनानिमित्त मा.मंत्रीमंडळाने

दिनांक ०१.११.२०१८ च्या निर्णयानुसार प्रशासकीय मान्यता तसेच या प्रकल्पात ५ वर्षाच्या कालावधीत (सन २०१८-१९ ते २०२२-२३) खर्चीत होणारा रु ३७००.४८ कोटी अंदाजीत रक्कमेस सुधारीत अर्थसंकल्पीय मान्यता ही प्रदान केली. या मंत्रीमंडळाच्या निर्णयाच्या अंमलबजावणीकामी पुढील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

३. मुंबई लगत अरबी समुद्रात उभारण्यात येणाऱ्या छत्रपती शिवाजी महाराज यांच्या आंतरराष्ट्रीय दर्जाच्या स्मारकाबाबत मान्य संकल्पचित्राच्या आधारावर सार्वजनिक बांधकाम विभागाने सादर केलेल्या पुढील विवरणपत्रानुसार स्मारकाचा मुळ खर्च व त्याचबरोबर जीएसटी व इतर शुल्क मिळून असे गणनेतील चुक दुरूस्ती नंतर एकूण रु.३६४३.७८ कोटी (रूपये तीन हजार सहाशे त्रेचाळीस कोटी अठ्ठ्याहत्तर लाख) इतक्या किंमतीच्या कामाचे अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**तक्ता-१.**

| अ.क्र. | खर्चाच्या बाबी | मुळ मान्यता (दिनांक ०५.०२.२०१४ चा मंत्रीमंडळ निर्णय तसेच दिनांक २८.०२.२०१४ चा शासन निर्णयानुसार) (रू. कोटीत) | सुधारीत मान्यता (रू. कोटीत जीएसटी सहीत) |
|---|---|---|---|
| १ | स्मारकाचे बांधकाम (व्दिपनिर्मिती धरून)<br>जीएसटी (१२%) | निरंक | २५८१.००<br>३०९.७२** |
| २ | अन्वेषण सर्वेक्षण, संकल्पचित्र, तज्ञांचा सल्ला इ. | ७.५० | -- |
| ३ | संकल्पना स्पर्धा | २.२५ | -- |
| ४ | सुरक्षा सुविधा व्यवस्था<br>(security infrastructure )<br>(प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर ) | -- | २३६.०० |
| ५ | कायमस्वरुपी विद्युत व पाणी पुरवठा<br>(प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर ) | -- | ४५.०० |
| ६ | देखभाल व दुरुस्तीकरिता SPV स्थापन करण्यासाठी (रु.१ कोटी) / अभ्यास दौरा (रु.२ कोटी) | -- | ३.०० |
| ७ | आकस्मिक खर्च ४ % (१ +४-जीएसटी) | -- | ११२.६८* |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | संगणकीकरण २ % (१+४-जीएसटी) | -- | ५६.३४* |
| ९ | सेंटेज चार्जेस ५% (१+४-जीएसटी) | -- | १४०.८५* |
| १० | प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांची फी<br>जेट्टी निर्माणासाठी अंशदान | निरंक | ८२.४६<br>७६.७३ |
| | **एकुण** | ९.७५ | ३६४३.७८* |

* आकस्मिक खर्च, संगणकीकरण, सेंटेज चार्जेस व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांची फी व इतर संकीर्ण बाबी या शिर्षाखाली गणितीय त्रुटी दुरूस्त केल्यावर एकुण प्रकल्पाची किंमत मंत्रीमंडळाने दिलेल्या मान्यतेच्या तुलनेने रू.५६.७० कोटी कमी करण्यात आला.(३७००.४८-३६४३.७८)

३.१ सार्वजनिक बांधकाम विभागाने सदर प्रकल्प राबवित असतांना वित्तीय नियमावली तसेच केंद्रीय सतर्कता आयोगाची मार्गदर्शक तत्वे यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी जेणेकरून कमीत कमी खर्चाने सदरचा प्रकल्प उभारणे शक्य होईल.

३.२ जीएसटी सदरी अनुक्रम १ वर दर्शविण्यात आलेल्या रू.३०९.७२ कोटी सेट ऑफ इत्यादी प्रक्रियेने कमी झाल्यास ती बचतीखाली वर्ग केल्या जाईल.

३.३ अनुक्रमांक ४ आणि ५ या कामानिमित्त निविदा इत्यादीची प्रक्रिया सुरू करण्याची कामे सां.बां.विभागाने यथाशिघ्र पार पाडावी जेणेकरून सुरक्षा, पाणीपुरवठा व विद्युतीकरणाच्या सर्व पायाभूत व्यवस्था मुख्य प्रकल्पाच्या बांधकामासहीत समांतर व एकात्मीकरित्या संपन्न होतील.

३.४ मान्य संकल्पचित्राच्या आधारावर सार्वजनिक बांधकाम विभागाने सादर केलेला अंमलबजावणी आराखडा व त्याप्रमाणे पाच वर्षात खर्चीत होणाऱ्या निधीचे विनियोजन खालील प्रमाणे असावे.

**तक्ता-२**

| आर्थिक वर्ष | अपेक्षित खर्च (रू.कोटीत जीएसटी सहीत) | सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करावयाच्या कामाची व्याप्ती |
|---|---|---|
| २०१८-१९ | ४१४.४० | 1. Survey, Investigation (by L&T)<br>2. Marine works including island reclamation (by L&T) |
| २०१९-२० | ११५३.६० | 1. Piling works for pedestal building (by L&T)<br>2. Construction of RCC Core of Pedestal Building (by L&T)<br>3. Construction of North & South Breakwater (by L&T)<br>4. Start of construction of Jetty Head building at island (by L&T)<br>5. Start of Statue work (by L&T)<br>6. Start of construction of Sea wall |
| २०२०-२१ | १०८६.६० | 1. Construction of balance pedestal building works (by L&T)<br>2. Construction of balance statue works (by L&T)<br>3. Architectural works, Electrical works, Mechanical works and MEP works (by L&T) |

| | | |
|---|---|---|
| | | 4. Construction of Sea wall (by L&T)<br>5. Construction of Entrance Forecourt (by L&T) |
| २०२१-२२ | ७६१.६० | 1. Completion of Site development (landscaping, lighting) (by L&T)<br>2. Completion of MEP works (by L&T)<br>3. Completion of Construction of Tulja Bhavani Temple (by L&T)<br>4. Completion of HVAC works (by L&T)<br>5. Completion of Construction of Helipad (by L&T)<br>6. Formation of Special Purpose Vehicle (SPV) for Operation & Maintenance<br>7. **Completion of Memorial works** (by L&T)<br>8. Start of Construction of Landside Jetties (by Others)<br>9. Start of Implementation of Security measure of Police Commissioner (by Others) |
| २०२२-२३ | २८४.४८<br>(-५६.७०) | 1. Construction of landside jetties (by Others)<br>2. Implementation of Security measure of Police Commissioner (by Others) |
| | [३७००.४८]<br>३६४३.७८ | |

३.५ सदर प्रकल्प उभारणीकरीता सन २०१३-१८ या कालावधीमध्ये प्रकल्पाचा आराखडा तयार करण्याकामी वेगवेगळ्या कारणासाठी निधीचा वापर करण्यात आला असून त्याकरीता रू.३६.८६ कोटी इतका खर्च करण्यात आला. यामध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाकडून भूमिपुजन कार्यक्रमाकरिता करण्यात आलेल्या रू.८.०० कोटी इतक्या निधिचा समावेश आहे. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात रू.३०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली होती. त्यामधून या आर्थिक वर्षात रू.०.६४ कोटी इतकी रक्कम खर्च झाली असून उर्वरीत रू.२९९.३६ कोटीचा निधी विनियोजनास उपलब्ध आहे. या प्रकल्पाच्या वेगवेगळ्या अनुषंगिक बाबींवर निर्गमित झालेल्या प्रशासकीय व आर्थिक मान्यतेचे विवरण खालील तक्त्यावर दर्शविण्यात आले आहे.

**तक्ता-३**

| अ.क्र. | प्रशासकीय मान्यतेचा शा.नि चा तपशील | वित्तीय मान्यता | झालेला खर्च |
|---|---|---|---|
| १. | शा.नि.क्र. स्मारक २०१३/प्रक्र २७७/२९ दि. ०६.०७.२०१३ | Research and survey -Rs.३.८९ Cr | ३.८९ कोटी |
| २. | शा.नि.क्र. स्मारक ३११४/प्रक्र ४०/२९ दिनांक २८.०२.२०१४ | एकुण तीन अनुषंगिक कामासाठी एकुण रू. ९.७५ कोटी | तक्ता-१ मध्ये दर्शविण्यात आले आहे. |
| ३. | शा.नि.क्र. स्मारक ३११४/प्रक्र ९४/२९ दिनांक १३.०८.२०१४ | Structural stability -३.६० Cr | ३.६० |

| | | | |
|---|---|---|---|
| ४. | शा.नि.क्र. स्मारक ३११६/अनौस-२/ प्रक्र ३०/२९ दिनांक ०३.०२.२०१६ | Setting up project office-Rs.१.१६Cr | १.१६ |
| ५. | शा.नि.क्र. स्मारक ३११५/प्रक्र ४०३/२९ दिनांक ३०.०३.२०१६ | Engagement of Project Management Consultant Rs.९४.०७ Cr | १५.७२ |
| ६. | शा.नि.क्र. स्मारक ३११६/३४७/प्रक्र १८५/२९ दिनांक ०१.०६.२०१७ | विद्युत व जलवाहिनी जोडण्याकरीता रू.३.४३ लक्ष | ३.४३ लक्ष |

३.६ वरील तक्त्यात दर्शविलेल्या रक्कम तसेच उद्धाटन समारंभा निमित्त सार्वजनिक बांधकाम विभागाने केलेल्या आकस्मिक निधीतून करण्यात आलेला खर्च देखील मंत्रीमंडळाने दि. १.११.२०१८ रोजीच्या बैठकीत मान्यतेमध्ये समाविष्ट झाला असे गृहित धरून सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या एकुण अर्थसंकल्पीय तरतुदीतुन योग्य शिर्षाखाली समायोजन करण्याची तजबिज ठेवावी.

४. मंत्रीमंडळाच्या दिनांक ०१.११.२०१८ च्या निर्णयानुसार लेखाशीर्ष ए-९ लेखाशीर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च (०१), कार्यालयीन इमारत ०५१, बांधकामे, राज्ययोजनांतर्गत योजना (००) (०१) अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराजांचे स्मारक उभारणे (४०५९ २५२१)-५३ मोठी बांधकामे या खाली उपलब्ध निधी मंजुरीचे व वितरणाबाबतचे सर्व अधिकार “ऑथोराईजेशन पध्दतीने” सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करण्यात येत आहे. या करिता वित्त विभागाच्या सल्ल्याने शासन निर्णय इत्यादी निर्गमित करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची राहील. परंतु तक्ता-१ मधील अनुक्रमांक ९ येथे दर्शविलेल्या “सेंटेज चार्जेस” हे सार्वजनिक बांधकाम विभागाची महसुलाची बाब असल्याने त्या संपूर्ण रकमेचे आहरण सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने केले जाईल. ही प्रक्रीया तक्ता-२ येथे दर्शविलेले प्रकल्पाचे सर्व कामकाज पूर्ण झाल्यानंतर तसेच सामान्य प्रशासन विभाग किंवा एस.पी.व्ही. किंवा प्राधिकृत यंत्रणेकडे समाधानकारकरित्या हस्तांतरणाची प्रक्रिया पूर्ण केल्यावर संपन्न केल्या जाईल.

५. सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी सदर स्मारकासाठी भविष्यात लागणाऱ्या निधिकरीता नव्याने स्वतंत्र लेखा उपशिर्ष उघडण्याची आवश्यक ते पाऊल उचलतील व तो निधी प्रकल्प परिपूर्ण होईपर्यंत त्या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणानुसार विनियोजन केले जाईल. प्रकल्प पूर्ण झाल्यावर त्याच्या देखभाल दुरूस्ती व परिचालना इत्यादी कामी लागणाऱ्या निधी व प्रशासकीय व्यवस्थेबाबतची सर्व जबाबदारी सामान्य प्रशासन विभागाच्या सनियंत्रणात असेल. प्रकल्प कार्यान्वियनाच्या दरम्यान परिछेद ४ वर दर्शविलेल्या लेखाशिर्षावर सामान्य प्रशासन विभागाने लाक्षणिक तरतूद ठेवण्याची तजबिज करावी.

६. प्रकल्पाची विशेषता लक्षात घेता व्दिपनिर्मितीनंतर भूभागाची स्थिती लक्षात घेवुन Structural design इ. बाबी निविदाकारांकडुन नव्याने प्रस्तुत होणार असल्याने तो स्वीकृत Concept Design प्रमाणे तयार करून घेणे व त्याप्रमाणे गुणवत्ता इत्यादी बाबी धोरणात्मकरित्या खात्री करून घेणे कामी दिनांक १९.०१.२०१६ रोजी पासून कार्यरत त्रीस्तरीय समितीने आवश्यकतेनुसार आपापल्या अधिकाराचा वापर करून तसेच तांत्रिक व इतर मान्यता प्रदान करुन संपुर्ण प्रकल्पाची अंमलबजावणी करणे अभिप्रेत आहे.

७. सदर आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठेच्या प्रकल्पाची कालबध्दतेने अंमलबजावणी करण्याची सर्वस्वी जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४७७/२०१८/व्यय-४, दि.१०.१२.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१९१८३९१७४४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Chhaya Kiran Wadte

Digitally signed by Chhaya Kiran Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f311bd8712a7b94b3b73d0e88ad01cf3a49c098bcd5f62e16e7135388baa523c, serialNumber=5bac345149360802f8cd3e4ab4ec174f2fec1bff420e81931e638ee6cdfcc12d, cn=Chhaya Kiran Wadte
Date: 2018.12.24 16:33:39 +05'30'

**( छाया किरण वडते )**

उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग

**प्रत,**

१.मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२.मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३.अपर मुख्य सचिव (प्र.सु., र. व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४.अपर मुख्य सचिव, (गृह) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५.प्रधान सचिव (पर्यटन) पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६.सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७.मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८.मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९.महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल ½ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
११.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, चेंबुर, मुंबई.
१२.कक्ष अधिकारी (कार्या-२५), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (कार्यासन-२९) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.